प्रत्येक जिल्ह्याकरीता जिल्हा पंचायत
संसाधन केंद्र (DPRC) स्थापन करण्यासाठी
तज्ञ गट समितीची स्थापना करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०१६/ प्र.क्र.१६९/ योजना-४

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई-४०० ००१.
तारीख: ०६ जानेवारी,२०१७.

**प्रस्तावना -**

राज्यात सध्या ६ शासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, ३ अशासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्र, एक संयुक्त प्रशिक्षण केंद्र कार्यरत आहेत. पंचायत राज मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली उपरोक्त प्रशिक्षण केंद्राऐवजी प्रत्येक जिल्ह्याकरीता जिल्हा पंचायत संसाधन केंद्र (DPRC) स्थापन करण्याबाबत सूचना दिल्या आहेत.

पंचायत राज मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांनी प्रत्येक जिल्ह्याकरीता जिल्हा पंचायत संसाधन केंद्र (DPRC) स्थापन करण्याबाबत दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने याबाबत अभ्यास करण्यासाठी तज्ञ गट समितीची स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय -**

राज्यात सध्या ६ शासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, ३ अशासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्र व १ संयुक्त प्रशिक्षण केंद्र कार्यरत आहेत. पंचायत राज मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली उपरोक्त प्रशिक्षण केंद्राऐवजी प्रत्येक जिल्ह्याकरीता जिल्हा पंचायत संसाधन केंद्र (DPRC) स्थापन करण्याबाबत दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने याबाबत अभ्यास करण्यासाठी तज्ञ गट समितीची (Expert Group) स्थापना करण्यात येत आहे. या समितीची रचना खालीलप्रमाणे आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | श्री. अजय सावरीकर, संचालक, राज्य ग्रामीण विकास संस्था, यशदा, बाणेर रोड पुणे. | अध्यक्ष |
| २ | श्री.गि.दि.भालेराव, उप सचिव (जि. प. आस्था), ग्राम विकास विभाग, मुंबई- ४०० ००१ | सदस्य |
| ३ | श्रीमती संध्या जगताप, प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, मांजरी फार्म पुणे. | सदस्य |
| ४. | श्री. अशोक राऊत, प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, बुलढाणा | सदस्य |
| ५. | श्री. चंद्रकांत मोरे, प्राचार्य, संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, कोल्हापूर | सदस्य |
| ६ | श्री. शिवशंकर भारसाखळे, संशोधन अधिकारी, राज्य ग्रामीण विकास संस्था, यशदा, बाणेर रोड पुणे. | सदस्य सचिव |

**<u>तज्ञ गट समितीची कार्यप्रणाली खालील प्रमाणे राहील :-</u>**

१. प्रशिक्षण संस्थांच्या किती जागा खाजगी व किती सरकारी आहेत, याची चौकशी करतील. जमीन खाजगी असल्यास तीचे स्थानांतर सरकारी मालकीत कसे करता येईल, व त्यास किती निधी लागेल याबाबत संस्थाचालक यांच्याशी समन्वय साधून त्याबाबतचा अहवाल सादर करणे.

२. प्रशिक्षण संस्थांचे जिल्हा पंचायत संसाधन केंद्र (DPRC) रुपांतर केल्यास अधिकारी / कर्मचारी यांच्या सेवा कशा प्रकारे वर्ग करता येतील, तसेच त्यांच्या सेवासमाप्तीचा लाभ देण्याबाबत अहवाल सादर करणे.

३. एका जिल्हयात दोन प्रशिक्षण केंद्र असतील त्यापैकी कोणते प्रशिक्षण केंद्र अन्य जिल्हयात नव्याने सुरु करता येईल, या संबंधीचा अहवाल सादर करणे.

४. मात्र ज्या जिल्हयात प्रशिक्षण केंद्र नाही, त्या जिल्हयामध्ये कोठे जिल्हा पंचायत संसाधन केंद्र (DPRC) सुरु करावे, ती सरकारी मालकीची जागा शोधून त्याबाबत अहवाल सादर करणे.

५. तज्ञ गट समिती अन्य राज्यांच्या क्षेत्रिय भेटी दरम्यान केलेल्या अभ्यासाच्या अनुषंगाने आपला प्रथम अहवाल तीन महिन्यात व त्यानंतर अंतिम अहवाल सहा महिन्याच्या आत शासनास सादर करेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०६१३१६२४४१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Aseem Gupta

Digitally signed by Aseem Gupta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42cb1d992ceadc1f5fea3c14e1cedf9b5ea392a9c81fdbde5629e68c9158678b, cn=Aseem Gupta
Date: 2017.01.06 16:32:08 +05'30'

**असीम गुप्ता**
सचिव, ग्राम विकास विभाग, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. मा.मंत्री, (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री, (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव

५. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव
६. विभागीय आयुक्त (सर्व)
७. जिल्हाधिकारी (सर्व)
८. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रबोधिनी (यशदा), पुणे
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१०.सह सचिव/ उप सचिव, ग्राम विकास विभाग (सर्व)
११.राज्य प्रकल्प संचालक, राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, रा.गां.पं.स.अ., पुणे
१२. प्राचार्य, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र व संयुक्त प्रशिक्षण केंद्र (सर्व)
१३.निवडनस्ती.